**केंद्र शासनामार्फत सन २०२२ मध्ये घेण्यात येणाऱ्या स्वच्छ सर्वेक्षण मध्ये Swachh Technology Challenge या घटकाच्या समोवशाबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: स्वमअ-२०२२/प्र.क्र.९/नवि-३४`**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: २० जानेवारी, २०२२

**वाचा-**

१. शासन निर्णय, नगर विकास विभाग, क्रमांक: स्वभाअ-२०१५/प्र.क्र.२३/नवि-३४,दि. १५/०५/२०१५.
२. केंद्र शासनाच्या गृहनिर्माण आणि शहरी विकास कार्य मंत्रालय (MoHUA) यांचे दि. २२/१२/२०२१ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना-**

देशातील सर्व शहरेपूर्ण पणे स्वच्छ, निरोगी आणि राहण्यायोग्य करणे आणि सर्व नागरिकांना स्वच्छ व चांगले आरोग्य आणि पर्यावरण मिळावे तसेच देशातील सर्व सांविधानिक शहरांना स्वच्छतेची आणि या शहरामधील नागरीकांना घरगुती शौचालयांची सुविधा उपलब्ध करून देणे, या उद्देशाने केंद्र शासनाने "स्वच्छ भारत अभियान (नागरी)" ची अंमलबजावणी सुरु केली आहे. या अभियानाच्या धर्तीवर संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये राज्यामध्ये "स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी)" राबविण्यात येत आहे.

२. स्वच्छ भारत अभियानामध्ये सहभागी होण्यास लोकांना उद्युक्त करणे व हागणदारीमुक्त व स्वच्छता या बाबतीत शहरांची कायमस्वरूपी क्षमता वाढविणे आणि स्वच्छ भारताच्या / महाराष्ट्राच्या दिशेने जी वाटचाल चालली आहे त्यामध्ये समाजातील सर्व घटकातील लोकांचा सांघिक सहभाग वाढविण्यासाठी जनजागृती निर्माण करण्याकरीता केंद्र शासन देशातील सर्व नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांचे स्वच्छतेच्या अनुषंगाने स्वच्छ सर्वेक्षण राबवित आहे.

३. केंद्र शासनाच्या गृहनिर्माण आणि शहरी विकास कार्य मंत्रालय (MoHUA) यांच्या संदर्भ क्र. २ येथील दिनांक २२ डिसेंबर २०२१ रोजीच्या पत्रान्वये Swachh Technology Challenge हा घटक स्वच्छ सर्वेक्षण २०२२ मध्ये समाविष्ट केला असल्याचे कळविले आहे. तसेच सदर चॅलेंज Agency Francaise de Development ह्यांच्या सहकार्याने उपक्रम राबविला जाणार आहे.

४. केंद्र शासनाने दिलेल्या निर्देशानुसार, केद्र शासनामार्फत सन २०२२ मध्ये घेण्यात येणाऱ्या स्वच्छ सर्वेक्षण मध्ये Swachh Technology Challenge या घटकावर काम करण्याकरीता त्याची कार्यपध्दत निश्चित करणे व सदर घटकाच्या प्रस्तावांना मान्यता देवून केंद्र शासनास सादर करण्याकरीता राज्य स्तरावर समिती स्थापन करणे ही बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय-**

प्रस्तावनेत नमूद केल्याप्रमाणे केद्र शासनामार्फत सन २०२२ मध्ये घेण्यात येणाऱ्या स्वच्छ सर्वेक्षण मध्ये Swachh Technology Challenge या घटकावर काम करण्याकरीता त्याची कार्यपध्दत व सदर घटकाच्या प्रस्तावांना मान्यता देवून केंद्र शासनास सादर करण्याकरीता राज्य स्तरावर समिती स्थापन करण्यास शासन मान्यता देत आहे.

२. Swachh Technology Challenge घटकांमध्ये प्रामुख्याने स्थानिक पातळीवरील महानगरपालिका, नगरपरिषद व नगरपंचायत यांनी त्यांच्या शहरातील नागरिकांचा गट, NGO, स्टार्टअप कंपनी इत्यादी मार्फत नाविन्यपूर्ण उपक्रमाबाबत प्रवेशिका मागवाव्यात. सदर प्रवेशिकांमधून निर्देशित केलेल्या मूल्यांच्या आधारावर तपासणी करण्याकरीता स्थानिक पातळीवर आयुक्त / मुख्याधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली समिती स्थापन करावी. सदर समितीमध्ये स्वच्छ महाराष्ट्र अभियानाचे नोडल ऑफिसर तसेच ज्या व्यक्तीना या विषयीचे तांत्रिक ज्ञान आहे अशा कोणत्याही दोन व्यक्तींचा समावेश करावा.

३. उपरोक्त समितीने निवडलेले जास्तीत जास्त दोन प्रवेशिका (उपक्रम) हे त्यांनी दिनांक २१ जानेवारी, २०२२ पर्यंत राज्य अभियान संचालक, स्वच्छ महाराष्ट्र अभियान संचालनालय यांच्याकडे सादर करायचे आहेत. सदर प्राप्त झालेले प्रस्ताव हे केंद्र शासनाने विहीत केलेल्या खालील निकषानुसार (Thematic Area) असणे अपेक्षित आहे:-

| S. NO | Solution Area | Type of Solution (not limited to) |
|---|---|---|
| 1 | Social Inclusion<br>(Resulting in better working condition for sanitation workers and waste pickers) | • Social innovations for improved waste collection and management in low income settlements<br>• Low-cost efficient mechanical solutions for cleaning septic tanks and sewer lines (Manhole to machine hole)<br>• Efficient operation and maintenance of community and public toilets in a hygienic and sustainable manner<br>• Safe containment, evacuation, transportation, processing and disposal of used water and fecal sludge & septage |
| 2 | Zero Dump | • Innovative solutions for tracking segregated door-to-door collection of solid waste<br>• Processing and recycling of all segregated fractions of Solid Waste<br>• Low-cost portable solution for remediation of legacy dumpsites |
| 3 | Plastic Waste Management | • Solution processing recycling plastic waste<br>• Solutions minimize degradation plastic during recycling<br>• Plastic waste management eco-sensitive regions<br>• Innovative for collection multi-layered and disposal<br>• Technology disposal plastic from legacy dumpsites<br>• Alternatives single use plastic |
| 4 | Transparency | • Digital solutions check the overflow septic tanks and sewer lines<br>• Citizen engagement including awareness and capacity building<br>• IoT based solutions real time monitoring operations Sanitation and Management Infrastructure |

४. सदरच्या या घटकाला स्वच्छ सर्वेक्षण २०२२ मध्ये एकूण २२५० पैकी १८५ गुण दर्शवण्यात आले आहेत. राज्य पातळीवरील प्राप्त झालेल्या प्रस्तावांमधून योग्य ३ प्रस्तावाची निवड करून दिनांक ३० जानेवारी २०२२ पूर्वी सदर प्रस्ताव केंद्र शासनास सादर करावयाचे आहेत. देश पातळीवरील निवडलेल्या १० प्रकल्पांना प्रत्येकी २५ लाख रुपये इतके भांडवल केंद्र शासनामार्फत उपलब्ध करून दिले जाणार आहे. तसेच एका वर्षापर्यंत त्यांना पूर्ण तांत्रिक सहकार्य मिळणार आहे. तसेच राज्यातील ५ प्रवेशिकांना (उपक्रम) राज्य शासनामार्फत खालील प्रमाणे प्रोत्साहन अनुदान देण्यात येणार आहे:-

| अ.क्र. | पहिला क्रमांक | दुसरा क्रमांक | तिसरा क्रमांक | चौथा क्रमांक | पाचवा क्रमांक |
|---|---|---|---|---|---|
| १ | ५ लक्ष | २.५ लक्ष | १.५ लक्ष | १.०० लक्ष | ०.७५ लक्ष |

५. राज्य स्तरावर प्रस्तावांची निवड करण्याकरीता स्थापन करण्यात येणाऱ्या समितीची संरचना खालील प्रमाणे असेल:-

| | | |
|---|---|---|
| १. | प्रधान सचिव (नवि-२) नगर विकास विभाग, मंत्रालय | अध्यक्ष |
| २. | महाराष्ट्र चेंबर ऑफ कॉमर्स यांचा प्रतिनिधी | सदस्य |
| ३. | महाराष्ट्र जिवन प्राधिकरण, कोकण विभाग यांचा एक प्रतिनिधी | सदस्य |
| ४. | माहिती तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय यांचा एक प्रतिनिधी | सदस्य |
| ५. | जी आय झेड या संस्थेचा एक प्रतिनिधी | सदस्य |
| ६. | राज्य अभियान संचालक, स्वच्छ महाराष्ट्र अभियान संचालनालय, मुंबई | सदस्य सचिव |

६. सदर समितीने राज्य पातळीवरील प्राप्त झालेल्या प्रवेशिका (उपक्रम) मधून योग्य ३ प्रस्तावांची निवड करून दिनांक ३० जानेवारी २०२२ पूर्वी सदर प्रस्ताव केंद्र शासनास सादर करणे आवश्यक आहे. सदर समिती ही स्वच्छ सर्वेक्षण २०२२ करीता असेल.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०१२०१२४०४८५१२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ajit Sahebrao Palwe

Digitally signed by Ajit Sahebrao Palwe
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bcc5dbdaa52955626b8257f1105a8a62ddbd1337948a428b4e4c992e5d3bf423, serialNumber=eeec7a4defed4a9827acaa40b255e88289e62111c82bcdb7dd2fe58860768930, cn=Ajit Sahebrao Palwe
Date: 2022.01.20 12:41:36 +05'30'

**( अजित पालवे )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा .मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा .राज्यमंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई
४. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई
५. विभागीय आयुक्त (सर्व)
६. जिल्हाधिकारी (सर्व)
७. आयुक्त, महानगरपालिका (सर्व)
८. मुख्याधिकारी, नगरपरिषद/नगरपंचायती (सर्व)
९. माहिती तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय यांचा एक प्रतिनिधी
१०. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय यांचे मुख्य अभियंता
११. राज्य अभियान संचालक, स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी), मुंबई.
१२. महाराष्ट्र जिवण प्राधिकरण, कोकण विभाग यांचा एक प्रतिनिधी
१३. महाराष्ट्र चेंबर ऑफ कॉमर्स
१४. जी आय झेड या संस्थेचा एक प्रतिनिधी
१५. निवडनस्ती, नवि-३४.